५/१

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य सद्गुरु भगवान

# श्रीधरस्वामी महाराज

" हृदयीं वेदगर्भ विलसे । मुखीं सरस्वती विळासे ।
साहित्य बोलतां जैसे । भासती देवगुरु ॥ दा. १-६-६॥
जे पवित्रपणें वैश्वानर । जे स्फूर्ति किरणाचे दिनकर ।
ज्ञातेपणें दृष्टीसमोर । ब्रह्मांड न ये ॥ ७ ॥
जे अखंड सावधान । जयांस त्रिकाळाचें ज्ञान ।
सर्वकाळ निराभिमान । आत्मज्ञानीं ॥ ८ ॥
शांति क्षमा दयासीळ । पवित्र आणी सत्वसीळ ।
अंतरशुद्ध ज्ञानसीळ । ईश्वरी पुरुष ॥ दा. १-८-१९ ॥

राष्ट्रगुरु श्रीसमर्थ रामदासस्वामी महाराजांनीं श्रीमत् दासबोधांत लिहीलेलें वरील आदर्श जीवनाचें चित्र ज्यांच्या जीवनाशीं तंतोतंत जुळतें तेचे आमचे सद्गुरु भगवान श्रीधरस्वामीजी. आमच्या अनंत कोटी जन्मांच्या पुण्याईनें भारतवर्षाच्या– या महाराष्ट्राच्या– पावन पुण्यभुमींत त्यांनीं जन्म घेतला आहे. आज आपल्या अविरत सुगंधानें लक्षावधि मानवांना शांति व स्वानंद यांचें प्रदान ते मुक्त हस्तानें करून त्यांचीं हृदयें पुळकित करीत आहेत.

**कुलवृत्तांत–** मराठवाड्यातील नांदेड जिल्ह्यातील देगलूर या तालुक्याच्या गांवीं श्रीस्वामीजींचे वाडवडिल रहात होते. श्रीस्वामीजींच्या पूर्वाश्रमीच्या घराण्याचें आडनांव पतकी व ते देशस्थ ऋग्वेदी आश्वलायन शाखी ब्राह्मण. श्रींच्या वडिलांचें नांव नारायणराव होते. नारायणरावांना आपल्या प्रथम पत्नीपासून रेणुका नांवाची कन्या झाल्यानंतर त्यांची पत्नी निवर्तली. त्यानंतर त्यांनी द्वितीय विवाह केला. त्यांच्या द्वितीय विवाहित पत्नीचें नांव कमळाबाई होतें व याच श्रीस्वामीजींच्या मातोश्री होत.

कमलाबाई अत्यंत प्रेमळ, शरीरानें सुदृढ, देखण्या, सुशील व कर्तव्यदक्ष होत्या. बोलतांना श्रीस्वामीजी आपल्या मातेची तुलना राजा हरिश्चंद्राच्या तारामतीशीं करीत असतात.

**जन्म**– नारायणरावांना द्वितीय पत्नीपासून त्रिंबक, गोविंद व गोदावरी हीं अपत्यें झाल्यावर कुलपुरोहितांनीं पतकी घराण्यास सर्पशाप असून पुढें निर्वंश होणार असल्याचें सांगून आपलीं अपत्यें अल्पायुषीच होतील असें सांगितल्यानें नारायणरावांनीं सहकुटुंब गाणगापूर येथें जाऊन लोककल्याणकारी सत्पुत्रप्राप्तीसाठीं उग्र साधना केली. त्याचें फलस्वरूपच कीं काय ? श्रीदत्तात्रेय महाराजांचा 'तुझ्या पोटीं अंशरूपानें येतो' असा दृष्टांत झाला. नंतर कमलाबाईंना दिवस जाऊन वैराग्यवृत्तीचे डोहाळे लागले व त्यांत त्या धर्मग्लानी, पुनरुद्धार या विषयांवर बोलूं लागल्या. शके १८३०च्या मार्गशीर्ष शु॥ १५ स म्हणजेच श्रीदत्त जयंतीच्या शुभदिनीं श्रीदत्त जन्मकालाच्या वेळींच गाणगापुराहून ७–८ मैल दूर असलेल्या चिंचोळी या गांवी कमलाबाई प्रसूत होऊन पुत्ररत्नाची प्राप्ति झाली. हेच आमचे चरित्र नायक श्रीसद्गुरु श्रीधरस्वामी महाराज. या पुत्ररत्नाचें नांव श्रीधर असें ठेवण्यांत आलें.

तिसऱ्या वर्षीं वडील व बाराव्या वर्षीं मातोश्री या दोघांचा स्वर्गवास झाला व त्यामुळें श्रीस्वामीजींना आपल्या मावशीकडे रहावें लागलें. शके १८४५ त माध्यमिक शिक्षण घेण्यासाठीं श्रींची स्वारी पुण्याच्या अनाथ विद्यार्थी गृहांत दाखल झाली. परोपकारी वृत्तीनें वागण्याचा स्वभाव, दयार्द्रत्व या गोष्टी जन्मतःच अंगवळणी पडल्यामुळें अभ्यास होईना त्यामुळें त्यांना अनाथ विद्यार्थी गृह सोडून दुसरीकडे रहावें लागलें. तेथें ते माधुकरी मागून आपलें शिक्षण पूर्ण करूं लागले.

**आदर्श विद्यार्थी**– विद्यार्थीदशेंत श्रींचा जीवनक्रम आचार विचार सम्पन्न असाच होता. पहाटें उठून, आपली खोली गाईच्या शेणानें सारवून सूर्योदयापूर्वी स्नान उरकून ते संध्या करीत. संध्येनंतर सूर्यनमस्कार घालीत.

४/१

रामनामाचा जप अखंड चालू असून ते त्रिकाल स्नान-संध्या करीत. गरीब विद्यार्थ्यांना मदत करण्यांत त्यांना आनन्द वाटे. ते गरीब विद्यार्थ्यांसाठीं माधुकरीहि मागून आणून देत असत. आजाऱ्याची सेवासुश्रुषा करणें त्यांना फार आवडे. सुश्रुषा करतांना ते रात्रीच्या रात्री जागून काढीत असत. फीसाठी नडलेल्या विद्यार्थ्यांना ते पैशाची मदत करीत, पुस्तकेंहि देत असत. आपल्या जवळचे पैसे संपल्यास स्वतः नोकरी करून त्यायोगें द्रव्यार्जन करून ते पैसे नडलेल्या विद्यार्थ्यांना मदत म्हणून देत. मदत मागण्यास आलेला कोणताहि विद्यार्थी त्यांनीं विन्मुख जाऊं दिला नाहीं. श्रीस्वामीजी गरीब विद्यार्थ्यांचा जणूं आसराच होते. विद्यार्थी दशेंतहि पाश्चात्य पद्धतीनें केस राखणें त्यांना आवडत नसे. तसेंच पुण्यासारख्या शहरांत राहूनहि त्यांना चहा, कॉफी, सिनेमा आदि कोणतेंच व्यसन स्पर्श करू शकलें नाहीं.

**साधना**– शके १८४९ च्या विजयादशमीस पुण्याहून श्रीक्षेत्र सज्जनगडावर तपःसाधनेसाठीं श्रीस्वामीजींनी प्रयाण केलें. प्रयाणापूर्वी त्यांनीं पुढील प्रमाणें प्रतिज्ञा केली.

१) मी आमरण अस्खलित ब्रह्मचर्याचें पालन करीन. २) द्रव्यास स्पर्श करणार नाहीं. कोणी द्रव्य दिल्यास त्याचा परोपकारार्थ विनियोग करीन. ३) कोठेंहि मठपति म्हणून रहाणार नाहीं. ४) स्वतःच्या गरजा कमीत कमी राखीन. ५) स्त्री पुरुषांत भेदभाव न ठेवतां त्यांना समदृष्टीनें बोध करीन. ६) अखिल स्त्रीसमाज मातेप्रमाणें मानीन. ७) धर्मग्लानी घालवून जग सुखी करीन. ८) लोककल्याणार्थच देह झिजवीन.

या सर्व गोष्टी करण्यासाठीं मी हा देह श्री भगवंतचरणी अर्पण केला आहे.

सज्जनगडावर श्रीस्वामींच्या खऱ्या पारमार्थिक जीवनास प्रारंभ झाला. येथें त्यांनीं सेवा व साधना यांची साक्षात् मूर्ति बनून कठोर तपस्या केली.

साधनाकाळांत श्रीसमर्थांनीं अनेक प्रकारें त्यांची परीक्षा पाहिली. श्रीस्वामीजी रात्रीं फारसें झोप घेत नसत. गडावर पाणी भरणें, समाधी व शेजघर यांतील सर्व प्रकारें सेवा करणें, जरूर तर स्वयंपाकांत मदत करून स्वयंपाकाची भांडी घासणें, पूजासाहित्याची सर्व प्रकारें तयारी करणें इत्यादि सर्व कामें दिवसा करून रात्रीच्या निवांतवेळीं श्रीसमर्थांच्या समाधीपाशीं गाभाऱ्यांत बसून नामस्मरणाच्या परमानंदामध्यें निमग्न होऊन वेळ घालवीत. श्रीस्वामीजी गडावर असतांना गडावरील व्यवस्थापक एक पेन्शनर फौजदार होते. त्यांना श्रीस्वामीजी करीत असलेली सेवा ढोंगीपणाची वाटून ते त्यांचा मत्सर करूं लागले. त्यांनीं श्रीस्वामीजींची खूप निंदा करण्यास सुरवात केली. त्यांना समाधीजवळ बसण्याची बंदी केली इतकेंच नव्हे, तर प्रवेशा-सहि प्रतिबंध केला. माधुकरी बंद करून गड सोडून जाण्यासहि सांगितलें. इतका विरोध होत असतांहि श्रीस्वामीजींची शांति ढळली नाहीं. इतका त्रास देऊनहि समाधान न झाल्यानें त्या कारभाऱ्यानें एका मांत्रिकाकडून श्रीस्वामीजींवर मूठ मारण्याचा प्रयत्न करविला पण श्रीस्वामीजींना श्रीसमर्थांच्या कृपेनें कांहींच त्रास न होता उलट त्या मांत्रिकाच्या सर्व शरीराची आग होऊं लागली व ती आग त्या मांत्रिकानें श्रीस्वामीजींची क्षमा मागून श्रीसमर्थांचें तीर्थ घेतल्यावरच कमी झाली व त्याचा मनस्तापहि कमी झाला. त्या वेळेपासून श्रीस्वामीजींबद्दल सर्वांना आदर व प्रेम वाटूं लागलें. श्रीस्वामीजी गडावर असतांनाच त्यांना श्रीसमर्थांकडून 'भगवान' ही उपाधि प्राप्त झाली.

या साधना काळांत कोणते अनुभव आले त्यांचें श्रीस्वामीजींनी आपल्या 'भक्तिसार' या पुस्तिकेंत वर्णन केलें आहे. त्यापैकीं लोकाप-वादाचें वर्णन येथें प्रथम देत आहोंत.

तरुण तुम्ही हे सोडितां संसार । रुचे हा विचार आम्हा न या ॥
प्रपंच सोडोनी परमार्थ कराल । तेणें कष्टी व्हाल तुम्हीं जगीं ॥
आधीं प्रपंच तो करावा नेटका । परमार्थ विवेका मग घ्यावें ॥

समर्थें कथिलें कैसी तुम्ही पोरे । अवज्ञा त्याची रे करी तसा ॥
बोलती हे ऐसे वृद्ध शिष्ट लोक । ........................ ॥७८॥
अहो कांहीं म्हणती अभाव वैराग्य । न दिसे हा योग्य आम्हालागी
भिकेचा हा धंदा सुलभ सर्वांसी । जो तो मागायासी सज्ज होय ॥
भिकाऱ्यांची संख्या झाली ऐसी फार । राष्ट्रा अनिवार संकट हें ।
म्हणे दुजा दिसे लबाड हा लुच्चा । म्हणे तो बा कच्चा बुवा यासी ॥
आम्ही बहु ऐसे धरीयले चोर । होतो फौजदार ठावे तुम्हां ॥८१
मारोनियां यातें घालवा येथोनी । शंका माझे मनीं येत बहू ॥८२
अहो म्हणति कांहीं बुवाबाजी फार । झाली अनिवार देशामध्यें ॥
कायदा नि ऐसा काढावा कीं कोणी । बुवा होतां धरुनी द्यावी शिक्षा
कैचें ब्रह्मचर्य कैचा अहो त्याग । लग्न लावावेगें बळें करा ॥८३॥
ऐसे जरी सर्व बुवा देशीं होती । तरी अधोगति राष्ट्रा सत्य ॥
वळवा म्हणे एक देतो मी मुलीतें । घरजांवई मातें हवा ऐसा ॥८४
आळवीता देवा म्हणति पहा ढोंगी । दावी आम्हालागीं ईशप्रेम ॥८५
लंगोटी घालोनी दावीत आम्हांला । म्हणा कीं मजला समर्थेची ॥
न मिळे खावया भिक्षा घरोघरा । कसा निलाजरा झाला पहा ॥
काय हो या झाली धाड गलेलठ्ठा । पूर्वजासि बट्टा लावियेला ॥८७
तुझी जात कोण, कोण आहे घरीं । कशासी ऐसे हें आचरसी ॥
विचारिती परी भिक्षा न घालतां । तिष्ठत ठेवती बाउगेची ॥
ब्राह्मण मी ऐसे सांगतो लबाड । ठेवील बिऱ्हाड कोठें तरी ॥८९
दुराचार करी चोरोनियां खळ । साधुवेषें भूक लावी जनां ॥
स्त्रीयांवरी याचा डोळा निशीदिनीं । कपटकरणीं भूलवीत ॥
घाली पांघरूण पापा यया वेषें । मुख पाहतां दोषे प्रायश्चित्त ॥
कोणी म्हणे कोठें चोरी करोनिया । आला पळोनियां यया स्थळीं

अहो म्हणे कोणी रात्रीं हा लुटारूं । दिवसासी थोरू साधु बने ॥
भिक्षेचिये मिसें घर परीक्षूनी । जात यया कोणी भूलूं नका ॥
कोणीहि न घाली भिक्षा दारांतरी । घालवी बाहेरीं रागेरागें ॥
वटारूनी डोळे चढवी भुवई । मारायासी येई शिव्या देत ॥
भिक्षा मागोनियां ऐसा लागवेग । प्रवेशूनी मग वनीं राही ॥९२॥

साधना करतांना कोणते सुखोपभोग साधकास मिळतात याचें श्रीस्वामीजींनीं स्वानुभवानेंच पुढें वर्णन केलें आहे.

आकाशाचें छत भूमीचा पर्यंक । इंद्रियें हीं देख परिचारासी ॥
वायू हा विंझणा देत या सुखातें । पुष्पसुगंधातें सेववीत ॥
निज परिवारें निशेचा रमण । अमृतकरें जाण श्रम हारी ॥
ईश-प्रेम सखी रिझविण्या यांसी । देत आल्हादासी नाना येत्नें ॥
तृण तेचि मऊ गादी या शयना । झोपे ऐसा जाणा महाराज ॥९३
वर्षाकाळीं जें कां भिजे याचें अंग । वाळे लागवेगीं हिंवाळ्यासी ॥
हिंवाळ्यांत जें कां गारठे शरीर । उन्हाळी समग्र शेकतसे ॥
गजचर्मापरी द्वंद्व सहनानें । कातडी ती जाणें कृष्णवर्ण ॥
दिगंबर तनु कटी कौपिनानें । आकाश चंद्रानें शोभे तेवी ॥९४

अशा साधनावस्थेंतील ऐश्वर्यांत दिवस काढीत असतां आपली काय स्थिती झाली हेंच श्रीस्वामीजींनीं पुढील अभंगांत वर्णिलें आहे.

राहावें न आतां प्राण जावो पाहे । धारिष्ट हे नोहे वाट पहाण्या ॥
असंख्य ते भक्त तुज रामराया । परी नाही यया स्वामी दुजा ॥
रडत स्फुंदत गडबडा लोळत । श्रीरामा बाहात करुण शब्दें ॥९६
अंत नको पाहूं प्राणांत मजला । दयाळा तुजला लाज माझी ॥
आठविलें तव मागील करणें । आस त्या कारणें वाटे बहु ॥
नको नको मज मोकलूं श्रीरामा । अगा सुखधामा दीनबंधो ॥
आतांची तू कैसा झालासां निष्ठूर । कर्म हें दुस्तर कैसें माझें ॥

कर्म जरी दुष्ट माझें बहू परी । तुजवीण तारी कोण मातें ॥१०२
पाहूं नको माझे गुणदोष देवा । आलोसे केशवा शरण तुज ।
धांवे धांवे आतां तळमळ भारी । कोणी न संसारीं तुजवीण ॥

शेवटीं साधकांची काय स्थिती होते हा श्रीस्वामींचा स्वानुभव पहा.

विरहव्यथा अति वाढे दिवसावरी । तळमळ भारी मनालागीं ॥
प्रेमवृत्ति नाभीपासोनी उसळे । तेणें तळमळे बहुसाल ॥
असह्य ही वृत्ति होये तये काळीं । वेड तयेवेळीं लागो पाहे ॥
फल-पर्ण-वायु जाहलें जीवन । सोडियलें अन्न देवासाठीं ॥११७
नावडे कांहींहि नाठवे कांहींहि । जगीं या कांहींहि सुख नुरे ।
नये धीर मना प्राण देवो पाहे । भेटी लवलाहे साधण्यास ॥११८

अशी परिस्थिती झाल्यावरच शेवटीं---

देहावरी ऐसा उदार पाहतां । राम होय त्राता भक्तालागीं ॥

वरील अभंगातून श्रीस्वामीजींनी स्वानुभवच वर्णिला आहे यांत मुळींच संशय नाहीं.

**श्रीसमर्थ साक्षात्कार**-- शके १८५१ चा दासनवमीचा उत्सव पारपडल्यानंतर श्रीस्वामीजी आपल्या नित्यक्रमानुसार रात्रीं श्रीसमर्थ-समाधीच्या भुयारांत श्रीसमर्थांचें चिंतन करीत बसले असतां ऐन मध्यरात्रीं त्यांना श्रीसमर्थांचें तेजोमय दर्शन घडलें. (यापूर्वीहि त्यांना श्रीसमर्थ साक्षात्कार झाला होता.) आणि त्यावेळीं दक्षिणेकडे जाण्याची आज्ञा झाली. त्या आज्ञेनुसार श्रीस्वामीजी सज्जनगडाहून दक्षिण दरवाजानें दक्षिणेकडे निघून गोकर्णक्षेत्रांत गेले व कर्नाटकांतील निरनिराळ्या भागांतून त्यांचा संचार झाला. नंतर शके १८५६ मध्यें श्रीस्वामीजी सज्जनगडावर आले व तेथें त्यांचा अंदाजें पांच वर्षे मुक्काम होता. शके १८६१ मध्यें ते पुन: कर्नाटकांत धर्मप्रसारार्थ गेले व शके १८६२ च्या विजयादशमीस चतुर्थाश्रमाचा स्वीकार केला.

त्यानंतर श्रीस्वामीजींनीं सर्व भारतांत आपल्या कार्याचा प्रसार करण्याकरितां निरनिराळ्या ठिकाणीं प्रयाण केलें व ठिकठिकाणीं चातुर्मास्य निवास केला आहे. चातुर्मासांत श्रीस्वामीजी पूर्ण एकांत व मौन राखतात. आजपावेतों श्रींचे २५ चातुर्मास झाले असून ते चिकमंगळूर, मंगळूर, गिरणार, अयोध्या, वाराणसी, वरदपूर, कन्याकुमारी, सज्जनगड, बदरिकाश्रम, हुशंगाबाद, इत्यादि ठिकाणीं झाले आहेत.

शके १८६७ मध्यें श्रींचा तंजावर, रामेश्वर या भारताच्या दक्षिण भागांत संचार झाला आजपावेतों सर्व भारतांत संचार करून धर्मजागृतीसाठीं श्रींनीं अविरत, अविश्रांत कार्य केलें आहे. वस्तुतः श्रीस्वामीजी खरोखरच 'विभूतिमत् श्रीमत् ऊर्जित' या कोटींतीलच आहेत. भारताच्या कानाकोपऱ्यांतून श्रीस्वामीजींचे शिष्य व भक्त विखुरले आहेत. जगाच्या हिताकरितां आणि भारतीयांच्या उद्धारासाठीं आर्यसंस्कृतीचें रक्षण करावें हें आपलें कर्तव्य आहे' असें श्रीस्वामीजी अत्यंत आग्रहानें सांगत असतात. तसेंच 'परमात्मस्वरूप होण्यासाठीं परमात्म्याचें ज्ञान करून घेण्याचें साधनच आमचा धर्म आम्हांस सांगत आला आहे. आपण तें स्वरूप प्रकाशविणारें साधन साध्य करून घेतलें पाहिजे.' असेंहि त्यांचें सांगणें आहे.

## श्रीस्वामीजींची ग्रंथरचना.

श्रीस्वामीजींच्या लेखणींतून शुद्ध परमार्थाची परम पावन भागिरथी अखंड स्रवत असते. त्या गंगौघांतून कांहीं लहान मोठे गद्य व पद्य ग्रंथ प्रसिद्ध झाले असले तरी अद्याप बरेंच वाङ्मय अप्रकाशित असून कांहींचा मागमूसहि लागत नाहीं. श्रीस्वामीजींची ग्रंथरचना गद्य व पद्यांत असून संस्कृत, मराठी, हिंदी, कनड व इंग्रजी या भाषांतून आहे. 'विवेकोदय, मोक्षसंदेश, मुमुक्षुधाम, स्वात्मनिरूपण' यासारखे स्वानुभवानें ओतप्रोत असलेले अत्यंत उच्च कोटीचे ग्रंथहि त्यांत आहेत. संन्यासी हा नेहमीं असंग्रहि वृत्तीचाच असतो. त्यानुसार श्रीस्वामीजी असंग्रहीच आहेत.

५/१

त्यामुळें त्यांनी केलेल्या लिखाणाचें जतन करणें व त्याची निगा राखून प्रकाशन करणें हें कार्य साहजिकच सर्व शिष्यभक्तांवर येऊन पडलें आहे. हें कार्य श्रीधरकुटी सज्जनगड, श्रीधर-स्फूर्ति-निवास वाराणसी, श्रीधर महामंडळ वरदपूर, सागर या संस्था करीत असून नासिकच्या श्रीसमर्थ श्रीधर तत्वज्ञान मंडळाकडून तेंच कार्य श्रीस्वामीजींच्या आशीर्वादानें गेल्या चार वर्षापासून श्रीधर–संदेशद्वारें चालू आहे.

श्रीस्वामीजींच्या ग्रंथरचनेपैकी पुढील वाङ्मय प्रकाशित झालें आहे.

**संस्कृत--** शिवशान्तस्तोत्रतिलकम्, दत्तकरुणार्णव, स्तोत्रावली प्रथमगुच्छ व द्वितीयगुच्छ.

**मराठी--** आर्यसंस्कृति, रामपाठ, श्रीसमर्थपाठ, श्रीमारुतीमहात्म्य, मोक्षसंदेश, उज्वलसंदेश, भक्तिसार, विषयी--मुनी संवाद, पंचीकरण, सप्ताध्यायी, निरनिराळ्या चातुर्मासांच्या सुरवातीस व समाप्तीच्या वेळीं दिलेले संदेश; स्वात्मनिरूपण, श्रीरामप्रसाद, श्रीसमर्थप्रसाद व विवेकोदय (हें श्रीधर-संदेशांतून क्रमशः प्रसिद्ध होत आहे.)

**हिंदी--** आर्यसंस्कृतीका दिव्य संदेश, आनंदतत्वमिमांसा, चातुर्मास-समाप्तिके अवसरपर दिये हुए विभिन्न दिव्य संदेश, सुमुक्षुधाम (हेंहि श्रीधर-संदेशातून क्रमशः प्रसिद्ध होत आहे.)

**कन्नड--** आर्यसंस्कृति, प्रवचनत्रय, प्रवचनपंचक, प्रवचनसुधा भाग १ ला, समर्थांचे श्रेष्ठत्व (प्रवचनें) स्वात्मनिरूपण. इ.

**इंग्रजी--** High Lights of Aryan Culture, Poems by Shri Shridhar Swamiji.

कांहीं अप्रकाशित वाङ्मय येणें प्रमाणें आहे.

**संस्कृत--** परिव्राटमननम् आदि स्तोत्रें.

**मराठी--** रामायण, सप्तशती, प्रवचनसुधा, वाक्सुधा, श्रींचीं पत्रें, स्वामीबोध.

**हिंदी**-- श्रीसमर्थचरित नवनीत, उपनिषत्‌राम, प्रवचनसुधा, आर्यसंस्कृति.

याखेरीज बरीच अज्ञात अशी ग्रंथसंपत्ति असावी असा अंदाज आहे.

## श्रीस्वामीजींचें अवतार वैशिष्ट्य

श्रीस्वामीजींच्या चरित्राचा अत्यंत बारकाईनें विचार केला तर त्यांचें चरित्र श्रीसमर्थांच्या चरित्राशीं बरेंच जुळतें आहे असेंच लक्ष्यांत येईल.

श्रीसमर्थांचा श्रीरामप्रभूंच्या जन्मदिनीं व समयीं जन्म झाला तर श्रीस्वामीजींचा जन्म श्रीदत्तजयंतीस श्रीदत्तजन्माच्या वेळीं झाला.

श्रीसमर्थांचें नांव नारायण होतें व तेच श्रीस्वामीजींचे गुरु. श्रीस्वामीजींच्या वडिलांचेंहि नांव नारायणच होतें.

श्रीसमर्थ व श्रीस्वामीजी या दोघांचें श्रीरामप्रभूवर नितांत प्रेम व निष्ठा आढळून येते. दोघेहि लहानपणापासून राष्ट्राची व धर्माची चिंता वहात होते व आहेत.

श्रीसमर्थांप्रमाणेंच श्रीस्वामीजींनीं सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्येसाठीं प्रयाण केलें. श्रीसमर्थ पंचवटीत येऊन श्रीरामापुढें आपले हृद्‌गत निवेदून त्यांच्या आज्ञेनुसार आपलें तपाचरण करते झाले तर श्रीस्वामीजींनीं सज्जनगडावर श्रीसमर्थांजवळ आपलें हृदय मोकळें करून त्यांच्या सान्निध्यांत आपली साधना पूर्ण केली.

श्रीसमर्थ व श्रीस्वामीजी यांना कोणीहि मानवी गुरु नाहीत.

श्रीसमर्थांनीं श्रीरामरायाचा आदर्श पुढें ठेवून रामराज्याची कल्पना साकार करण्यासाठीं प्रयत्न केला तर श्रीसमर्थांचा आदर्श समोर ठेवून राष्ट्र व धर्म यांच्या उद्धारार्थ त्यांच्या शिकवणीनुसार प्रयत्न करीत श्रीस्वामीजी आपलें आयुष्य वेंचित आहेत.

श्रीसमर्थांप्रमाणेंच श्रीस्वामीजींनीं निरनिराळ्या ठिकाणीं धर्मप्रचार-

कार्यार्थ केंद्रें चालू केलीं असून श्रीसमर्थांच्या **मठपती होऊन बैसो नये ।।** या वचनानुसार श्रीसमर्थांप्रमाणेंच श्रीस्वामीजी कोठेंहि मठपति झाले नाहींत व होणारहि नाहींत.

श्रीसमर्थावतारापूर्वी ३०० वर्षे चालू असलेल्या परकीय छळामुळें जनता त्रस्त होऊन परमेश्वरी अवताराची वाट वहात होती. अशा हताश परिस्थितींत श्रीसमर्थांचा अवतार झाला. त्याचप्रमाणें १५० वर्षांच्या परकीय राज्यामुळें भारतांत धर्माला आलेली ग्लानी बालविण्यासाठी, राष्ट्रधर्माची बिघडलेली घडी बसविण्यासाठीं, अवास्तव वाढलेल्या पाश्चिमात्यीकरणाचा मोड करण्यासाठींच श्रीस्वामींचा अवतार आहे.

**असत्याचें भय निश्चित । दैवतें जाहलीं पाषाणवत ।**
**मंत्रांचें सामर्थ्य राहिलें समस्त । न्यायनीत बुडाली !!**

या श्रीसमर्थोक्तिप्रमाणेंच देशांतील परिस्थिति असतांच

**कराया जगाचा उद्धार । जाहला श्रीधरअवतार ।**
**धरेवरीं जो झाला भार । नष्ट करिती श्रीधर ।। १ ।।**
**अनादि पातकांचे संस्कार । सरले श्रीधरकृपें समग्र ।**
**तरले जीव भवसागर । श्रीधरानुग्रहें ।। २ ।।**
**स्वरूपसाक्षात्कार निर्धार । करावया राष्ट्रभूचा उद्धार ।**
**स्वानंदविग्रही साचार । श्रीधर प्रगटले ।। ३ ।।**

श्रीसमर्थांप्रमाणेंच 'आधी केलें मग सांगितलें ।' या श्रीदवाक्यानुसार श्रीस्वामीजींचें आचरण आहे. तसेंच

**जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा ।**
**राहरहो शोध घ्यावा । परांतराचा ।।**

या शिकवणीप्रमाणें प्रेमानें व हितोपदेशानेंच समाजाशीं त्यांचें वागणें असून सत्यस्वरूपदृष्टीनेंच ते जीवन व्यतीत करीत आहेत.

**धर्म स्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।**
**जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ।।**

श्रीसमर्थकृपाप्रसादानें आपणांस श्रीस्वामीजीस्वरूपीं ईश्वरी देणें आपल्या पूर्वभाग्यानेंच लाभलें आहे.

बहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी ।
ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होते ।।
विवेक एकांतीं करावा । जगदीश धारणेनें धरावा ।
लोक आपला आणि परावा । म्हणोंचि नये ।।

या श्रीसमर्थशिकवणीचें धडेच श्रीस्वामीजी प्रत्यक्षांत गिरवीत आहेत तसेंच श्रीस्वामीजींच्या चरित्राचें अवलोकन केल्यावर

सकळांसी नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें ।
अखंड कोणी येकाचें उणें । पडोंचि नेदि ।। १ ।।
उत्तम गुणें शृंगारला । तो बहुतामध्यें शोभला ।
प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड जैसा ।। २ ।।

या श्रीसमर्थांच्या वचनांचा अनुभव आल्याशिवाय रहात नाही.

श्रीसमर्थांप्रमाणेंच 'कांहीं गल्बला कांहीं निवळ । ऐसा कंठित जावा काळ । जेणें करितां विश्रांति वेळ । आपणासी फावे ।।' असेंच त्यांचें आचरण आहे.

राष्ट्र व धर्म यांच्या उद्धारासाठीं सूक्ष्मपणें निरिक्षण करून त्यासाठीं आवश्यक तपोबल प्राप्त करून घेण्यासाठीं श्रीस्वामीजी वारंवार एकांतवासांत जात असतात. गेलीं कांहीं वर्षें श्रीस्वामीजी एकांतवासांत असून अद्याप निदान एक वर्ष ते एकांतांत रहाणार आहेत. विश्वशांति व धर्मोन्नति हाच त्यांच्या चालू तपश्चर्येचा मूळ हेतु आहे.

सर्वे जनाः सुखिनो भवन्तु । सर्व सुखी असावे । ऐसी वासना ।।
या एकाच हेतुनें त्यांचें मौन व एकांतवास चालू असतात. श्रीसमर्थसद्गुरु व श्रीस्वामीजी हे शिष्य, तेव्हां गुरुंच्याच उपदेशाप्रमाणें शिष्याचें आचरण असणार. तद्वत आपणहि यथामति, यथाशक्ति आपल्या श्रीसद्-

५/१

गुरु भगवानांच्या आज्ञेनुसार वर्तन केल्यास आपण आपला जन्ममृत्युफेरा चुकवूं शकूं यांत शंका नाहीं.

श्रीस्वामीजींकडे पाहिलें असतां जणूं काय श्रीसमर्थच श्रीस्वामीजींच्या स्वरूपांत अवतीर्ण होऊन सज्जनांचें रक्षण, दुष्टनिर्दालन व धर्मस्थापना करीत आहेत आणि योग्य धर्ममार्गाचें निदर्शन करण्यासाठींच स्वतः अगदीं अचूक धर्माचरण आचरीत आहेत हेंच स्पष्ट दिसून येतें.

धन्य ते हो कुळ । धन्य तो कीं वंश ।
ज्याठायीं श्रीधर । अवतरले ॥ १ ॥
धन्य ते जननी । धन्य तिची कूस ।
जे धर्मभास्करास । प्रसवली ॥ २ ॥
धन्य ते संबंधी । धन्य शिष्यगण ।
जाइ उद्धरून । कुळ त्यांचें ॥ ३ ॥
धन्य ते हें स्थान । धन्य तो हा देश ।
जेथें होत वास । श्रीधराचा ॥ ४ ॥

नमः शांताय दिव्याय सत्यधर्मस्वरूपिणे ॥
स्वानंदामृततृप्ताय श्रीधराय नमो नमः ॥

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य सद्गुरु भगवान
श्रीधरस्वामी महाराज की जय ।



मराठींतील पहिलेंच होमिओ—बायोकेमिक मासिक
वार्षिक वर्गणी रु. ५. ] होमिओ—दूत [ व्ही. पी. नाही.
आठव्या वर्षांत पदार्पण — दर १० दिनांकास प्रसिद्ध होतें.
व्यवस्थापक—होमिओ-दूत, १०४३ चांदवडकर रस्ता, नासिक-१.